**सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य हज समितीस निधी वितरित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हज-२०२०/प्र.क्र.६३/का-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०९ ऑक्टोबर, २०२०.

**संदर्भ**:- १. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६.०४.२०२०.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४.०५.२०२०.
३.शासन निर्णय, अल्पसंख्याक वि. विभाग, क्र.हज-२०२०/प्र.क्र.६३/का-५,दि.०८.०५. २०२०.

**प्रस्तावना**:-

उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये करोना विषाणूमुळे उद्भवलेल्या महामारीच्या परिस्थितीत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या अर्थसंकल्पिय तरतुदी पहिल्या तीन महिन्याकरिता *"अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स)"* वर मंत्रालय विभागांना वितरीत करण्यात आल्या आहेत. तसेच, उपरोक्त संदर्भ क्र.२ चे शासन निर्णयान्वये सध्या अत्यावश्यक बांधील खर्चाच्या अनुषंगाने ०१-वेतन, ०४-निवृत्तीवेतन, ३६-सहायक अनुदाने (वेतन), इत्यादी उद्दिष्टशिर्षाव्यतिरिक्त इतर बाबींवर खर्च करण्यापूर्वी वित्त विभागाची अनुमती घेण्यात यावी, असे अभिप्राय दिले आहेत. वित्त विभागाचे संदर्भ क्र.१ येथील परिपत्रक व संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये या विभागाची *मागणी क्र. झेड ई-१, "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च (अनिवार्य), ३६ सहायक अनुदान (वेतन), (२२३५ ए २६७)"* या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी रू.७४.६६ इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला असून तो तो सर्व निधी *"अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर(बीम्स)"* प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध आहे. वितरणासाठी उपलब्ध झालेल्या या निधीमधून, महाराष्ट्र राज्य हज समितीचे अधिकारी व कर्मचारी यांच्या माहे एप्रिल, २०२० ते जून, २०२० या ३ महिन्याच्या कालावधीचा वेतनावरील खर्च भागविण्यासाठी रू.६.७५ लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला आहे. सदर निधीपैकी रू.१,५६,९०६/- इतका निधी शिल्लक असल्याने महाराष्ट्र राज्य हज समितीने माहे जुलै, २०२० ते मार्च, २०२१ या कालावधीतील वेतनावरील खर्च भागविण्यासाठी रू.२०.६७६ लक्ष इतक्या निधीची मागणी केली आहे. ही बाब विचारात घेता, माहे जुलै, २०२० ते मार्च, २०२१ या कालावधीतील महाराष्ट्र राज्य

हज समितीचे अधिकारी व कर्मचाऱी यांच्या वेतनावरील खर्च भागविण्यासाठी महाराष्ट्र राज्य हज समितीस निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u>**:-

या विभागाची मागणी क्र. झेड ई-१, *"२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च (अनिवार्य), ३६ सहायक अनुदान (वेतन), (२२३५ ए २६७)"* या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या निधीमधून माहे जुलै, २०२० ते मार्च, २०२१ या कालावधीतील महाराष्ट्र राज्य हज समितीचे अधिकारी व कर्मचाऱी यांच्या वेतनावरील खर्च भागविण्यासाठी रु.२०.६८ लक्ष इतका निधी महाराष्ट्र राज्य हज समितीस पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

| अनु.क्र. | लेखाशिर्ष | कालावधी | रक्कम रूपयांमध्ये |
|---|---|---|---|
| १ | योजनेत्तर मागणी क्र. झेड ई-१, *"२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च (अनिवार्य), ३६ सहायक अनुदान (वेतन), (२२३५ ए २६७)"* | जुलै, २०२० | *१४,६००/- |
| २ | | ऑगस्ट, २०२० | १,७१,५००/- |
| ३ | | सप्टेंबर, २०२० | १,७१,५००/- |
| ४ | | ऑक्टोबर, २०२० | २,८५,०००/- |
| ५ | | नोव्हेंबर, २०२० | २,८५,०००/- |
| ६ | | डिसेंबर, २०२० | २,८५,०००/- |
| ७ | | जानेवारी, २०२१ | २,८५,०००/- |
| ८ | | फेब्रुवारी, २०२१ | २,८५,०००/- |
| ९ | | मार्च, २०२१ | २,८५,४००/- |
| | | एकुण रूपये | २०,६८,०००/- |

* महाराष्ट्र राज्य हज समितीचे अधिकारी व कर्मचाऱी यांच्या वेतनावरील खर्च भागविण्यासाठी दरमहा आवश्यक असलेली रक्कम रू.१,७१,५००/-पैकी त्यांच्याकडे शिल्लक असलेला रु.१,५६,९०६/- इतका निधी वजा करता माहे जुलै, २०२० साठी रू.१४,६००/- इतक्या रक्कमेचे वाटप करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य हज समिती कार्यालयाने खालील अटीं व शर्तीचे पालन करणे आवश्यक आहे.

अ. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्त करण्यात येत आहे.

आ. उपरोक्त खर्च विहित कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

इ. नियंत्रक अधिकारी यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतुदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

ई. सदर तरतूद खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

उ. महाराष्ट्र राज्य हज समिती कार्यालयाने आर्थिक वर्ष २०२०-२१ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.

ऊ. महाराष्ट्र राज्य हज समिती कार्यालयाने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करून दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (Utilisation Certificate) देखिल महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१ मुंबई व शासनास तातडीने सादर करावे.

ऋ. उपरोक्त अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई यांना राहतील व त्याकरिता सदर समिती त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करून देईल.

ऌ. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहित पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.

ऍ. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२० व दि. ०४.०५.२०२० च्या शासन निर्णयातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

**३.** शासन परिपत्रक, वित्त विभाग, अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० अनुसार माहे एप्रिल, २०२० ते जून, २०२० या ३ महिन्याच्या कालावधीसाठी महाराष्ट्र राज्य हज समितीस वितरित केलेल्या निधीची *"उपयोगिता प्रमाणपत्रे"* महाराष्ट्र राज्य हज समितीने शासनास सादर केली आहेत.

**४.** सदरील खर्च *"मागणी क्र. झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च (अनिवार्य), ३६ सहायक अनुदान (वेतन),*

*(२२३५ ए २६७)"* या लेखाशिर्षा अंतर्गत सन २०२०-२१ मध्ये उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**५.** हे आदेश वित्त विभागाचे शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० व शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.४ मे, २०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहेत.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००९१५३१११४६१४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mahesh Sadashiv Choukekar

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Miniorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=965737dc18a2c1fbaf047c7a9f61259e5c65db981c8eaaab6c983897e5318874, cn=Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2020.10.09 15:59:28 +05'30'

**( म. स. चौकेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, रूम नं.६, तळमजला, साबू सिद्दिकी, मुसाफिरखाना, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.

**प्रति,**

१. महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),मुंबई/नागपूर, महाराष्ट्र राज्य.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३. अवर सचिव (व्यय-४/अर्थ-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सह /उप सचिव (का-५/का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. निवडनस्ती (का-५).